**राज्य योजना सन २०१६-१७ निसर्ग पर्यटन योजने अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०१६.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक ०१.४.२०१६.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६.
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- ०३.०८.२०१६.
४. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- २०.०९.२०१६.
५. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- १७.१०.२०१६.
६. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.१६ /प्र.क्र.२२५/फ-१, दिनांक :- २५.१०.२०१६.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. २३(१६-१७)/१४२९/१६-१७, दिनांक २८.१०.२०१६.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. २३(१६-१७)/१४५०/१६-१७, दिनांक २८.१०.२०१६.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. २३(१६-१७)/१४९३/१६-१७, दिनांक ०७.११.२०१६.

प्रस्तावना :-

सन २०१६-१७ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत संरक्षित क्षेत्र व इतर वनक्षेत्रातील निसर्ग पर्यटनासाठी रुपये ५६७४.८८ लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वेळोवेळी सादर केलेल्या प्रस्तावांनुसार निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या योजनेतर्गत संदर्भीय शासन निर्णय क्र.३,४,५ व ६ अन्वये संरक्षित क्षेत्राकरता रु. २७२४.८७ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

संदर्भ क्रमांक ७, ८ व ९ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निसर्ग पर्यटन योजना (२४०६-२२९५) या योजनेतर्गत संरक्षित क्षेत्रांकरीता रु. ४४५.४८ लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

उक्त योजनेमधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी माहे डिसेंबर, २०१६ पर्यत खर्च करण्यास **" अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे खालील अटींच्या अधीन राहून **रुपये २०७.०२ लक्ष निधी** खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१६-१७ मध्ये लेखाशिर्ष क्र.२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे प्राप्त होणाऱ्या निधीतून सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावी.

२. योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे, याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबीवर निधी खर्ची टाकण्यात यावा आणि याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांची राहील.

३. कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

४. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही या अटीवर मंजूरी देण्यात येत आहे.

५. केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.

६. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक:- २०.०४.२०१६ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२३१२५५५६४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2016.11.23 12:58:22 +05'30'

(अरविंद आपटे)
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति :**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ, नागपूर
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
७. महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.

********

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०७.१६/प्र.क्र. २२५ /फ-१, दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०१६ सोबतचे विवरणपत्र.**

**(रक्कम रुपये लाखात)**

| प्रधान शिर्ष | सविस्तर शिर्ष | नोव्हेंबर, २०१६ | डिसेंबर, २०१६ | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| २४०६ २२९५ | ०२-मजुरी | १४.०४ | ३२.७८ | ४६.८२ |
| | २१- पुरवठा व सामग्री | ११.४६ | २६.७४ | ३८.२० |
| | २७-लहान बांधकामे | ३.९० | ९.०८ | १२.९८ |
| | ५०-इतर खर्च | ३२.७० | ७६.३२ | १०९.०२ |
| | **एकूण** | **६२.१०** | **१४४.९२** | **२०७.०२** |

*****

**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०७.१६/प्र.क्र. २२५/फ-१, दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०१६ सोबतचे परिशिष्ट**

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई. यांचेकडील खालीलप्रमाणे एकूण कामे रु. २०७.०२ लक्ष.**

**माळढोक पक्षी अभयारण्य.**

| अ.क्र. | योजनेतील प्रस्तावित बाबनिहाय कामे | बाबनिहाय अंदाजित रक्कम (लाखात) |
|---|---|---|
| १ | निसर्ग परिचय केंद्र कामोणे सभोवताली कुंपनासह मुख्य प्रवेशद्वार तयार करणे. | ६.०० |
| २ | नान्नज येथे पर्यटकांच्या वाहनांसाठी वाहन तळ बांधणे. | २.०० |
| ३ | निसर्ग परिचय केंद्र नान्नज सभोवताली २५० र. मी. वॉल कंपाऊंड तयार करणे. | ६.०० |
| ४ | कामोणे येथे टॉयलेट व बाथरुम बांधणे. | ३.०० |
| ५ | नान्नज व करमाळा येथे पॅगोडा बांधणे. | ६.०० |
| ६ | निसर्ग परिचय केंद्र कामोणेची दुरस्ती करणे. | ३.०० |
| ७ | निसर्ग परिचय केंद्र नान्नजची दुरस्ती करणे. | ०.५० |

| | | |
|---|---|---|
| ८ | निसर्ग परिचय केंद्र नान्नज येथे फेरोसिंमेटचे नवीन प्रवेशद्वार तयार करणे. | २.५० |
| ९ | निसर्ग परिचय केंद्र करमाळा येथे फेरोसिंमेटचे नवीन प्रवेशद्वार तयार करणे. | २.५० |
| १० | करमाळा येथे पर्यटक प्रवेश चेक पोस्ट सभोवताली चेन लिंक फेन्सिंग तयार करणे. | ३.०० |
| ११ | विनविश्रामगृह नान्नज येथे फेरोसिमेंटचे नवीन प्रवेशद्वार तयार करणे. | २.५० |
| १२ | नान्नज निसर्ग परिचय केंद्र व टेन्ट येथे सोलर स्ट्रीट लाईट बसविणे. | १.७५ |
| १३ | नान्नज वनविश्रामगृह व टेन्ट येथे सोलर वॉटर हिटर बसविणे. | २.०० |
| १४ | टेन्ट व टेन्ट प्लॅटफॉर्मचे नुतनीकरण करणे. (संख्या - २) | १६.०० |
| १५ | Establishmof Souvenit Shop at Nannaj | २.०० |
| १६ | निसर्ग परिचय केंद्र नान्नज ऑडीओ-व्हिजूअल सिस्टीम खरेदी करणे. | १.०० |
| १७ | हॅन्डी कॅमेरा व बायनाक्युलर खरेदी करणे. | १.६५ |
| १८ | नान्नज येथे पर्यटकांसाठी पिण्याचे पाण्याची सुविधा करणे. | १.५० |
| १९ | नान्नज येथे मिटींग हॉलसाठी साहित्य खरेदी. | १.०० |
| २० | नान्नज वनविश्रामगृह कॅम्पससाठी इलेक्ट्रीक ट्रान्सफॉर्मर बसविणे. | ३.०० |
| २१ | मल्टी टयुल्ब्यूलर हॉट वॉटर बॉयलर पाईपलाईनसह बसविणे. | २.०० |
| | **एकूण** | **६८.९०** |
| | **रेहेकुरी काळविट अभयारण्य** | |
| १ | Extension of Rest house with seminar hall, dining hall with kitchen. | ७५.०० |
| २ | Entrance gate with Chain link fencing work around tourist stay complex and range office | १०.०० |
| ३ | Water Harvest unit for Tourist tents at Reheluri. | २.९५ |
| ४ | Provision for drinking water facility to tourist and range staff at Rehekuri | २.५० |
| | **एकूण** | **९०.४५** |
| | **मयुरेश्वर सुपे अभयारण्य** | |
| १ | निसर्ग, परिचय केंद्र सुपे भोवती संरक्षक भिंत उभारणे. | १६.८१ |
| २ | निसर्ग पीरचय केंद्रातील अंतर्गत रस्त्यांची दुरुस्ती. (४०० मी.) | ८.२९ |
| ३ | जल साठ्याभोवती फेरोसिमेंटमध्ये लाकडी आभासाचे रेलींग तयार करणे. | ३.०० |
| ४ | निसर्ग केंद्र परीसरातील पर्यटकांसाठी लोखंडी लहान पूल तयार करणे. | ०.८० |
| ५ | पर्यटकांसाठी फेरोसिंमेंटमधील लाकडी आभासाचा पॅगोडा उभारणे. | ३.०० |
| ६ | निसर्ग माहिती केंद्रातील अंतर्गत रस्ते व पर्यटक निवासासाठी विद्यूत स्ट्रीट लाईट उभारणे. | १.५० |
| ७ | निसर्ग माहिती केंद्र परीसरातील किमया गार्डन व पर्यटक निवास तंबु समोर पेव्हिंग ब्लॉक बसविणे. | १०.०० |
| ८ | निसर्ग माहिती केंद्राचे प्रवेशद्वारवर स्लायडींग लोखंडी डेकोरेटिव्ह गेट उभारणे. | ०.८० |

| | | |
|---|---|---|
| ९ | निसर्ग परिचय केंद्रातील मोठ्या वृक्षांभोवती पर्यटकांसाठी ओटे तयार करणे. | १.०० |
| १० | जुन्या Plinth चे नुतनीकरण करुन टेन्ट ओटयाचे बांधकाम करणे. | ०.६७ |
| ११ | पर्यटक निवारा छतांची दुरुस्ती करणे. | १.५० |
| १२ | पर्यटकांसाठी तंबू निवासनजीक सिंटेक्स पाण्यची टाकी उभारणे. | ०.३० |
| | **एकूण** | **४७.६७** |

*******